**सन २०२०-२१ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या राज्य योजनेअंतर्गत मौ. सोनसळ येथील श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांच्या वेतनावरील खर्च भागविण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. निसप-२०२०/प्र.क्र.८६/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- १० सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०
३. वित्त विभाग, परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५, दि. २६ मे, २०२०
४. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१३३(१३-१४)/५३/२०२०-२१, दिनांक १७.०६.२०२०

प्रस्तावना :-

सन २०२०-२१ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या राज्य योजनेअंतर्गत रु.६२२०.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम,२०२० ला अनुसरुन करोना विषाणूमुळे उद्भवलेल्या महामारीच्या परिस्थितीत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या अर्थसंकल्पीय तरतूदी पहिल्या तीन महिन्यांकरीता (जून, २०२० अखरे) एकूण वार्षिक तरतूदीच्या १५ ते २५ टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीत अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ चे शासन निर्णयान्वये सध्या अत्यावश्यक बांधिल खर्चाच्या अनुषंगाने ०१-वेतन, ०४-निवृत्ती वेतन, ३६-सहाय्यक अनुदान (वेतन), इत्यादी उद्दीष्टशीर्षाच्या व्यतिरिक्त इतर बांबीवर खर्च करण्यापूर्वी वित्त विभागाची अनुमती घेण्यात यावी, असे अभिप्राय दिलेले आहेत. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रक व शासन निर्णय दि.०४.०५.२०२० नुसार ०१-वेतन रु.१५.६० लक्षपैकी बीडीएस वर **रु.५.४६ लक्ष** इतका निधी वितरित करण्याकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.४ अन्वये मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कोल्हापूर अंतर्गत असलेल्या सोनसळ येथील श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांच्या वेतन व भत्त्यांचा खर्च भागविण्यासाठी ०१- वेतन रु.१५.६० लक्ष व ११-प्रवास खर्च रु.१.१० लक्ष असे एकूण १६.७० लक्ष इतक्या रकमेचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यास शासन मंजूरी प्रदान करुन

अनुदान उपलब्ध करुन देण्यास विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यानी संदर्भ क्र.४ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे संदर्भ क्र.१ व ३ येथील परिपत्रक व संदर्भ क्र.२ चा शासन निर्णय विचारात घेता, प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या योजनेमधून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीच्या अनुषंगाने मौ. सोनसळ येथील श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांच्या वेतनावरील खर्च भागविण्याकरीता **०१-वेतन रु.५.४६ लक्ष** इतका निधी (२४०६-२२९५) या लेखाशिर्षा अंतर्गत विहीत केलेल्या खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. संस्थेने आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
६. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
७. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.
८. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.
९. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२०, २६.०५.२०२० चे परिपत्रक व दि.४.५.२०२० चा शासन निर्णयातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्रमांक-सी-०७ प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) ०१- वेतन या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०२०-२१ मध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२० चे परिपत्रक व वित्त विभागाच्या दि.०४.०५.२०२० चा शासन निर्णय तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/ २०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१११४३६०६२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Laxmanrao Kathole

Digitally signed by Sunil Laxmanrao Kathole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28a37fe1ff3e4e025e695251dc7073be0c55927dfde2440021496777c190c146, serialNumber=d2cb6e9ba02dfc9c368a0dfe373a6877ad6cad79f1363d85e0435ea61d33c752, cn=Sunil Laxmanrao Kathole
Date: 2020.09.11 14:37:40 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
**कक्ष अधिकारी (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कोल्हापूर
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
७. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)